राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ.परसोडी बु. (ता. कळंब, जि. यवतमाळ) नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१८/प्र.क्र.२०३/ पापु-१३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०२ फेब्रुवारी, २०१९

<u>वाचा</u>

१) पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१८१४/प्र.क्र.१९५/पापु-१३, दि.०५ सप्टेंबर, २०१४
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे पत्र क्रमांकः यजिप/पापुवि/तांशा/ ४२६२/२०१८, दि. ११ सप्टेंबर, २०१८
३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्रमांकः तांशा/२३/राग्रापेका/२०१८-१९, दि.२४ मे, २०१८

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मौ.परसोडी बु. (ता. कळंब, जि. यवतमाळ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.७१.७८ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापि, तांत्रिक बदलामुळे योजनेच्या किंमतीत वाढ झाली असल्याने, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये रु.७४.८६ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौ.परसोडी बु. (ता. कळंब, जि. यवतमाळ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ.परसोडी बु. (ता. कळंब, जि. यवतमाळ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७४.८६ लक्ष (रु. चौ-याहत्तर लाख शाऐंशी हजार फक्त)

इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना जिल्हा परिषदेमार्फ़त कार्यान्वित करण्यात येईल.

२) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

३) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

४) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे/जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

५) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

६) हागणदारी मुक्तीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) योजना पुर्नसुधारित होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

८) योजनेची उर्वरित कामे ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.३.०८ लक्ष (अक्षरी रुपये तीन लाख आठ हजार फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातर्गत राज्य हिश्श्यातून/जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१२३५३४६७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2019.02.02 16:59:07 +05'30'

**(रा. अ. साबणे)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) मुख्य/अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
९) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ
११) निवड नस्ती (पापु-१३)